<u>मागणी क्रमांक झेड एच-५ लेखाशिर्ष ४७०२ ए ०२८</u>
पाझर तलाव जानोरी, ता. रावेर जि. जळगांव.
(भूसंपादन निधी)

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : भूसंपा-२०२४/प्र.क्र. ६१८(२) /जल-४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०९ जून, २०२५.

**वाचा:** १) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१४/ प्र.क्र. ४१/ भाग-१/ अ-४, दिनांक ०३/११/२०१६, २३/०२/२०१७ व १३/०८/२०१८.
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक यांचे पत्र क्र. प्रा.ज.अ./मृदवजसं/वि/ना/ चिशा/ भूसं/ ४८८६ / सन २०२४, दिनांक ०५/१२/२०२४.
३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३,दिनांक ०७/०४/२०२५.

**<u>प्रस्तावना</u>:** राज्य एकत्रित निधीच्या लेखाशिर्ष संकेतांक क्रमांक ४७०२ ३८१३ (४७०२ ए ०२८) खाली मंजुर असलेला पाझर तलाव जानोरी, ता. रावेर, जि. जळगांव या प्रकल्पाकरिता संपादीत केलेल्या जमीनीच्या भूसंपादन प्रकरण क्र. ०७/०३ मधील एल.ए.आर.क्र. ६१९/२०१४ या दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर) भूसावळ, जि. जळगांव यांनी दिलेल्या आदेशानुसार वाढीव मोबदला अदा करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती. त्यानुषंगाने प्रस्तुत न्यायालयीन प्रकरणात मा. दिवाणी न्यायालयाने दिलेल्या आदेशाविरुध्द वरिष्ठ न्यायालयात अपील न करण्याबाबत अभिप्राय असल्याने संदर्भीय क्र. २ येथील प्रस्तावावर खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>शासन निर्णय</u> : पाझर तलाव जानोरी, ता. रावेर, जि. जळगांव या प्रकल्पाच्या उपरोक्त भूसंपादन प्रकरणात मागणी विवरणपत्रानुसार देय रक्कम एकूण रुपये ५.२८ लक्ष (अक्षरी रुपये पाच लक्ष अठ्ठावीस हजार फक्त) वितरित करण्यास याद्वारे खालील अटी व शर्तीच्या अधीन शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.**

अ) वरील प्रकल्पाच्या भूसंपादनाकरिता अन्य स्त्रोतांकडून निधी उपलब्ध झाला असल्यास याद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या रक्कमांचे आहरण अथवा वितरण करण्यात येवू नये,
ब) तसेच भूसंपादन प्रयोजनार्थ उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या वरील निधीची गरज नसल्यास, सदर निधी कोणत्या ही परिस्थितीत परस्पर अन्य प्रयोजनार्थ वितरित करण्यात येवू नये,
क) कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदर रक्कम तातडीने शासनाकडे प्रत्यार्पीत करावी,
ड) निधी वितरणासंबंधीच्या वित्त विभागाच्या संदर्भीय दिनांक ०७/०४/२०२५ च्या परिपत्रकामधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोर पालन करावे.

२.  याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम, संबंधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक यांनी आहरित करुन, त्यांचे अधिनस्त संबंधित अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी.

३.  यावर होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक झेड एच-५,
४७०२- लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च,
(००),
(१०१), भूपृष्ठ जल
(०१) लहान पाटबंधारे,
(०१) (०२) लहान पाटबंधारे योजना, १०१ ते २५० हे.सि. क्षमता (कार्यक्रम) (४७०२ ए ०२८),
५३, मोठी बांधकामे

४.  वरील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतिस्वाक्षरित प्रती अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेक्षिक क्षेत्र, पुणे आणि शासनास सादर कराव्यात.

५.  याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबंधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक यांची राहील व अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेक्षिक क्षेत्र,पुणे हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

६.  प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १२५/२०२५, दिनांक २२/०५/२०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३९०/ व्यय-१५, दिनांक ०५/०६/२०२५ च्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०६०९१७५६०००७२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार वा नावाने.

YOGESH SHIVAJI THAKRE

Digitally signed by YOGESH SHIVAJI THAKRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=12b49c34288b66cadf05f508044fb7990386a7a80b591f01ea5c5637b8e9531f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8B737CC2C4B5965A0F6266A94D548836ABFD8BD70D096E1702CD9556363A062D, cn=YOGESH SHIVAJI THAKRE
Date: 2025.06.09 17:57:04 +05'30'

**(यो.शि.ठाकरे)**
**महाराष्ट्र शासनाचे कक्ष अधिकारी**

**प्रति,**

१) अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे.
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक.

३) विशेष भुसंपादन अधिकारी (१), अ.ता.प्र. (ह.) जळगांव.

४) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, जळगांव.

५) महालेखापाल (लेख व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/ २,मुंबई/ नागपूर.

६) जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव.

७) कक्ष अधिकारी (जल-११), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

८) निवड नस्ती, कार्यासन (जल-४)

**प्रत अग्रेषित,**

१. मा.विरोधी पक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव.

२. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.

३. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फत संबंधीत लघु सिंचन (जलसंधारण) उपविभागीय अभियंता).

४. सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई. (यांचे स्वीय सहायक)

५. आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर.